**मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी**
**चित्रपट परीक्षण समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: गोचिन-२०२०/प्र.क्र.२७/भाग-१/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ जानेवारी, २०२२.

**वाचा :** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.गोचिन-२०१८/ प्र.क्र.६३/ सां.का.१, दि.२९.११.२०१८.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र ०८ (०२)/सां.का.१, दि.१८.०१.२०२०.
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र २७/ सां.का.१, दि.२३.०९.२०२१.

**प्रस्तावना :**

शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या "दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करणे" बाबतच्या योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपट परीक्षण समिती उपर्निर्दिष्ट शासन निर्णय दि.२९.११.२०१८ अन्वये गठीत करण्यात आली होती. उपर्निर्दिष्ट शासन निर्णय दि.१८.०१.२०२० अन्वये ती रद्द करण्यात आली आहे. उपर्निर्दिष्ट शासन निर्णय दि.२३.०९.२०२१ अन्वये चित्रपट परीक्षण समिती नव्याने गठीत करण्यात आली होती. आता, सदर समितीमध्ये नव्याने काही सदस्यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपटांचे परीक्षण करुन दर्जा निश्चित करण्याकरिता व अर्थसहाय्याची शिफारस करण्यासाठी दि.२३.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आलेल्या समितीवर आता नव्याने आणखी खालील सदस्यांची नियुक्ती शासन करीत आहे :-

| अ.क्र. | अशासकीय सदस्यांची नावे | |
|---|---|---|
| १ | श्री. विजय सिताराम पाटील | सदस्य |
| २ | श्री. बाळासाहेब गोरे | सदस्य |

सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई हे या समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

२. शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या "दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करणेबाबतच्या" योजनेनुसार चित्रपटांचे परीक्षण करुन अर्थसहाय्याकरीता पात्र चित्रपटांची शिफारस करण्यासाठी गठीत करण्यात आलेली चित्रपट परीक्षण समिती, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांचे अधिनस्त कार्यरत राहील. या समितीचा कार्यकाल या शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन वर्ष अथवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी अगोदर जे घडेल तोपर्यंत असेल.

३. चित्रपट परीक्षणाकरीता ३३% सदस्यांची उपस्थिती आवश्यक राहील. समिती सदस्यांनी केलेल्या शिफारशींवर योजनेतील तरतुदीनुसार पुढील कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांचेकडून करण्यात येईल.

४. या समितीवरील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार प्रवास भत्ता, बैठक भत्ता व मानधन अनुज्ञेय राहील. यासाठी होणारा खर्च दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगांव, मुंबई यांनी त्यांना योजनेंतर्गत मिळणाऱ्या सेवाशुल्कातून भागवावा.

सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०१२७१६५६४९५६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, pseudonym=2908C178C06A08E995849046F8BCFB7325B57851, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2022.01.28 11:18:39 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अधयक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा.मंत्री /मा.राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. सर्व मा.मंत्री /मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
१०.सचिव,सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
१२.उप सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
१३.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१५.महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
१६.चित्रपट परीक्षण समितीचे नवनियुक्त सदस्य, द्वारा- दादाासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
१७.निवडनस्ती (सां.का.१)